**साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक, " अण्णा भाऊ साठे संशोधन व प्रशिक्षण संस्था" चिरागनगर, घाटकोपर, मुंबई येथे बांधणे व सदर प्रकल्प सार्वजनिक निकडीचा प्रकल्प (Vital Project) घोषित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्र.गृहनि-२०२३/प्र.क्र. ९१(२)/बांधकामे**
पहिला मजला, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ११ मार्च, २०२४

**वाचा:-**मा.मंत्रिमंडळाची दि.११.०३.२०२४ रोजीची बैठक...

**प्रस्तावना:-**

राज्य शासनाने विख्यात साहित्यिक, संयुक्त महाराष्ट्र चळवळीतील अग्रणी नेते, साहित्यरत्न अण्णा भाऊ साठे यांचे वास्तव्याचे ठिकाण पत्राचाळ, चिरागनगर, घाटकोपर (प.), मुंबई-४०० ०८६ स्मारक म्हणून घोषित केले आहे. सदर ठिकाणी त्याचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे यथोचित स्मारक उभारण्याच्या अनुषांगाने मा.मुख्यमंत्री महोदय, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षेतेखाली दि.२६.०७.२०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे स्मारक समिती दि.१८.९.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली होती. सदर समितीच्या बैठका आयोजित करण्यात आल्या होत्या तसेच स्मारकाचे कामकाजासंदर्भात तात्पुरत्या स्वरूपात कार्यालय सुरू करण्यात आले होते. तद्नंतर या समितीची बैठक तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.११/२/२०१९ रोजी झाली. या बैठकीतील चर्चेनुसार विभागाच्या दि.२६.७.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, साहित्यरत्न अण्णा भाऊ साठे यांचे वास्तव्याचे ठिकाण पत्राचाळ, चिरागनगर, घाटकोपर (प.) मुंबई येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याचे काम झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण व म्हाडा किंवा शिवशाही या पुनर्वसन प्रकल्पांतर्गत करण्याचा निर्णय घेण्यात आला. तसेच या प्रकल्पाचे विकासक म्हणून झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण (SRA) राहतील असा देखील निर्णय घेण्यात आला. त्यानुसार झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण (SRA) साहित्यरत्न अण्णाभाऊ साठे यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याबाबतचा प्रस्ताव शासनास केला असून सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे यांच्या स्मृती जपण्यासाठी मौजे चिरागनगर, घाटकोपर, मुंबई येथील जागेवर साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे

स्मारक "साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे संशोधन व प्रशिक्षण संस्था", चिरागनगर, मुंबई या बांधकामास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे-

१) साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे यांच्या स्मृती जपण्यासाठी मौजे चिरागनगर, घाटकोपर, मुंबई येथील जागेवर साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक बांधण्याकरीता रू.३०५,६२,२९,१७३/- (अक्षरी रूपये तीनशे पाच कोटी बासष्ट लक्ष एकोणतीस हजार एकशे त्र्याहत्तर फक्त) इतक्या रकमेस अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२) साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे स्मारक, चिरागनगर, घाटकोपर पश्चिम येथील प्रकल्प हा शासनाचा सार्वजनिक निकडीचा प्रकल्प (Vital Project) म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३) सदर प्रकल्पाची कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाला विनिर्दिष्ठ करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालास आवश्यक त्या सर्व परवानगी प्राप्त करून घेऊन सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्याची कार्यवाही झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने करावी.तद्नंतर सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही शासनामार्फत करण्यात येईल.

५) सदर प्रकल्पाचे बांधकाम, प्रकल्पासाठी आवश्यक असलेल्या खाजगी जागेचे संपादन त्याचप्रमाणे सदर जागेवरील पात्र झोपडपट्टी धारकांचे विहित पध्दतीने पुनर्वसन करणे याची संपूर्ण जबाबदारी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाची राहील.

६) सदर प्रकल्पाचे बांधकाम, जागेचे संपादन व पात्र झोपडपट्टीधारकांचे पुनर्वसन यावरील खर्च झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने त्यांच्याकडे जमा होणाऱ्या "पायाभूत सुविधा शुल्क निधी" तून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७) सदर प्रकल्पासाठी खाजगी जागेचे संपादन महाराष्ट्र झोपडपट्टी (सु.नि. व.पु) अधिनियम १९७१ नुसार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८) सदर प्रकल्पाचे काम हाती घेण्यापूर्वी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने विहित कार्यपध्दतीनुसार "प्रकल्प सल्लागाराची" नियुक्ती करून प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात समाविष्ट घटक व त्यावरील बाबनिहाय खर्चाची सविस्तर छाननी करून प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्याची कार्यवाही पूर्ण करावी असे झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाला निर्देश देण्यात येत आहे.

९) सदर प्रकल्पासाठी निश्चित केलेल्या जागेच्या जमिन वापरात बदल करणे आवश्यक असल्यास त्याकरीता झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या सल्ल्याने आवश्यक ती कार्यवाही करून स्मारकाचे काम हाती घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१०) सदर प्रकल्पाच्या जलद अंमलबजावणीसाठी मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून सनियंत्रण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

११) सदर प्रकल्पाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने प्रकल्पाचे हस्तांतरण सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दि.११.०३.२०२४ रोजीच्या बैठकीतील घेतलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१११९५८५९४७२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2024.03.11 20:08:19 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई, महाराष्ट्र राज्य,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
४. मा. विरोधी पक्षनेता विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
५. मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
६. मा. राज्यमंत्री ( सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
७. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
८. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
९. सर्व सन्माननीय सदस्य, विधान सभा/ विधान परिषद
१०. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, महाराष्ट्र राज्य,
११. मा. अमुस/प्रधान सचिव/सचिव (सर्व) मंत्रालयीन विभाग,
१२. मा. सचिव (सा.न्या. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त,बृहन्मुंबई महानगरपालिका,मुंबई
१४. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
१५. जिल्हाधिकारी मुंबई शहर/मुंबई उपनगर,
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक तथा उपाध्यक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (MHADA), मुंबई,
१८. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
१९. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण,
२०. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,जिल्हा परिषद